**राज्यातील अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत दुसरी / तिसरी पाळी सुरू करणे. सन २०१७-१८ करिता अनुदानाचे वाटप.**

## महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः औप्रसं-२०१७/प्र.क्र. ४६/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ मे, २०१७.

**वाचा -**

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग : शासन निर्णय क्रमांक - आयटीआय-००९/(११/०९)/व्यशि-३, दि. २९/८/२००९ व दि.२१/८/२०१०

२) वित्त विभाग : शासन परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८/४/२०१७.

३) अल्पसंख्याक विकास विभाग : शासन परिपत्रक क्रमांक - अविवि-२०१७/प्र.क्र.३१/ का.७, दि.१९/४/२०१७.

४) या विभागाचे पत्र क्र. औप्रसं-२०१६/प्र.क्र. ७७/का. ८, दि.१८ एप्रिल, २०१७.

५) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग : शासन निर्णय क्रमांक - बियुडी : १७१६/२०१६/ २०१६/प्र.क्र.७९/रोस्वरो-२, दि.२०/४/२०१६.

**प्रस्तावना -**

राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी ४२ अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुस-या/तिस-या पाळीत २४८ तुकडया त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणा-या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये २८ तुकडया सुरू करण्यास दि.२९/८/२००९ व दि.२१/८/२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकान्वये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०१७ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ८० टक्केच्या मर्यादेत करण्याच्या सूचना निर्गमित केल्या आहेत. भांडवली खर्चासाठी तसेच केंद्र पुरस्कृत कार्यक्रम व त्याअनुरुप राज्य हिस्सा यासाठी ही मर्यादा १०० टक्के इतकी आहे. संदर्भ क्र.२ अन्वये विविध शासकीय / प्रशासकीय संस्थांना तसेच अनुदानित संस्थांना सहायक अनुदाने मंजूर करण्यापूर्वी त्यांचेकडून पूर्वी खर्च केलेल्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे विभागाने प्राप्त करावी. तसेच तीन महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानाचा ७५ % विनियोग पूर्ण झाल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत करण्यात येऊ नये, अशा स्पष्ट सूचना वित्त विभागामार्फत देण्यात आल्या आहेत. या विभागाचे संदर्भ क्र. ४ अन्वये संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांना सन २०१६-१७ करिता वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याबाबत कळविण्यात आले आहे. त्यानुसार संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत फक्त १७ शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे. उर्वरीत उपयोगिता प्रमाणपत्र अप्राप्त आहेत. अशा परिस्थितीत निधी वितरीत करता येत नाही. तथापि सदर योजनेखाली ४४

शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील कर्मचारी हे शासकीय कर्मचारी आहे. त्यांचे वेतन अदा होणे आवश्यक आहे, ही बाब विचारात घेता, ०१-वेतन या उद्दिष्टाखाली तीन महिन्याकरिता निधी वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या ४२ विद्यमान शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था तसेच बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणाऱ्या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थाकरिता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००-इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)" या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ करिता रु.१५.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीत तरतूद आहे. आता वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकान्वये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता प्रथम नऊमाहिकरिता (डिसेंबर, २०१७ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ८० % मर्यादेत निधीचे रु.१२,००,००,०००/- (रुपये बारा कोटी फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार ०१ - वेतन या उद्दिष्टाखाली अर्थसंकल्पित तरतूद रु.१४,५०००,०००/- इतकी असून त्यानुसार ८० % च्या मर्यादेत रु.११,६०,००,०००/- अनुज्ञेय आहे. आता एप्रिल, २०१७ ते जून, २०१७ या तीन महिन्याकरिता ०१-वेतन या उद्दिष्टाखाली रु.३,८७००,०००/- (रुपये तीन कोटी सत्याऐंशी लाख फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे. उर्वरीत उद्दिष्टांकरिता निधीचे वितरण उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाल्यानंतर करण्यात येईल :-

(रुपये हजारात)

| अ. क्र. | बाब | अर्थसंकल्पित निधी | वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|
| १ | ०१ वेतन | १४५००० | ३८७००० |
| **एकूण** | | **१४५०००** | **३८७०००** |

२. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे संदर्भ क्र.४ अन्वये निधी वितरीत करण्याकरिता नवीन नियंत्रक अधिकारी, संचालक (प्रशिक्षण), (२२३०) झेए-१०००४ असा सुधारित करण्यात आला आहे. सदर तरतूद यापूर्वीच्या खर्चाच्या उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावयाच्या अटीच्या अधिन राहून संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते "नियंत्रक अधिकारी" आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून काम पाहतील.

३. संचालक, (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी निधी वितरीत करतांना तसेच तो खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, प्रशासकीय मान्यता आदेश व वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय इत्यादी मधील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात यावी.

४. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र ( Utilization Certificate ) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहीत मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय संदर्भ क्र. २ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकातील सूचनेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०५२९१०४८१७७०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=39e858554371a26f6672b036224cff0a48a63a836a4067a8da9a8cca6d83429e, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2017.05.29 13:04:31 +05'30'

**( सं. छ. तडवी )**
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (सर्व), महाराष्ट्र राज्य, संचालक (प्रशिक्षण),व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, संचालक (प्रशिक्षण), व्य.शि. व प्र. संचालनालय यांचे मार्फत
८. नियोजन विभाग का. १४७५,
९. वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,
१०. अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, **सदर रक्कम व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या संचालक, (प्रशिक्षण)-(२२३०) झेडए-१, ०००४ वर बी.डी.एस. तात्काळ उपलब्ध करून देण्याची विनंती करण्यात येत आहे.**
११. निवडनस्ती.